**महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणाऱ्या थेट कर्ज योजनेतील अटी व शर्तीमध्ये सुधारणा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन शुद्धिपत्रक क्रमांक : थेकयो-२०२२/प्र.क्र.४३/महामंडळे**
मोतीमहल इमारत, चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०
दिनांक : १७ एप्रिल, २०२५

**संदर्भ :** १) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : महामं-२००४/प्र.क्र.३८/विघयो-२, दिनांक ३०.११.२००४
२) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : मंत्रिमं-२०१९/प्र.क्र.१०/महामंडळे, दिनांक २८.०१.२०१९

**शासन शुद्धिपत्रक :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळामार्फत राज्यातील इतर मागास प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देण्याकरिता संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये रु.२५,०००/- ची थेट कर्ज योजना राबविली जाते. संदर्भ क्र.२ येथील दिनांक २८.०१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर थेट कर्ज योजनेच्या कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविण्यात आली असून सदर शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

➢ **अटी व शर्ती -**

**यामधील अट क्र.१ ते ४ येथे नमूद मजकूर वगळून त्याऐवजी खालीलप्रमाणे वाचावे -**

१. शेतजमिनीवर (७/१२) बोजानोंद किंवा मिळकत नमुना ८अ / मिळकत पत्रिका (लाभार्थीच्या नावावर नोंद असलेले घर) घरावर महामंडळाचा बोजानोंद करण्यात यावा. त्यासाठी सदर मिळकतीचे मुल्यांकन सादर करावे.
२. लाभार्थीने स्वतःच्या ७/१२ किंवा नमुना ८अ / मिळकत पत्रिका बोजानोंद करुन दिले असल्यास एक ७/१२ धारक किंवा मिळकतदार / नोकरदार जामीनदार घेण्यात यावा.
३. लाभार्थ्यांच्या नावावर जमीन नसल्यास व जामीनदाराच्या जमिनीच्या ७/१२ वर बोजानोंद करुन दिले असल्यास इतर एक जामीनदार ७/१२ किंवा मिळकतदार / नोकरदार घेण्यात यावा.
४. ही अट (शेतजमिनीचा शोध अहवाल) संपूर्णतः शिथिल करण्यात येत आहे.

➢ **जामीनदार -**

**यामधील अट क्र. १, ३, ५, ७ व १२ येथील नमूद मजकूर वगळून त्याऐवजी खालीलप्रमाणे वाचावे -**

१. एक जामीनदार शासकीय कार्यालयातील उदा. महामंडळ, महानगरपालिका, नगरपरिषद, ग्रामपंचायत, जिल्हा परिषद शाळा, शासकीय मंडळे, शासन मान्य अनुदानित शाळा इ. शासकीय कार्यालयांमध्ये कायमस्वरुपी (Permanent) पदावरती कार्यरत हमीपत्रधारक जामीनदार घेण्यात यावा.

३. शासकीय जामीनदाराची सेवा किमान ५ वर्ष शिल्लक असावी.

५. लाभार्थीच्या जामीनदाराने सादर केलेल्या हमीपत्राची संबंधित कार्यालयांकडून पडताळणी करुन घेण्यात यावी.

७. सदर कर्जातून लाभार्थीसाठी जी मत्ता निर्माण होणार आहे ती ज्यांच्याकडून निर्माण होईल त्यांचेकडून ती मत्ता चल (Movable) मालमत्ता असेल तर परस्पर महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकडे तारणगहाण (Hypothecate) करण्यात यावी.

१२. ही अट रद्द करण्यात येत आहे.

**२.** सदर शासन शुद्धिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०४१७१८०१०८५७३४ असा आहे. हे शासन शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.04.17 18:02:03 +05'30'

**(साहिल धनवडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई.
५. निवडनस्ती (महामंडळे)